**श्री महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी, ता. कामठी, जि. नागपूर या तीर्थस्थळ विकास आराखड्याअंतर्गत नविन / सुधारीत कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- नासुप्र-१६२२/प्र.क्र.२२७/नवि-२६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २९ मे, २०२५.

**वाचा:-**

१) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.१६/१४४४ दि.२६ मे, २०१५.

२) महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचे पत्र क्रमांक /का.अ (प्रकल्प)/३०९७ दि. २० जानेवारी, २०२५.

३) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हास्तरीय समिती, नागपूर यांचे पत्र क्रमांक-क्र.डेस्क १२/एमयुएन-३/कावि-३४/२०२५ दि. २४ जानेवारी, २०२५.

४) शासन पत्र क्रमांक -नासुप्र-१६२२/प्र.क्र.२२७/ नवि-२६ दि.१५ फेब्रुवारी, २०२३.

५) शासन निर्णय क्र. नासुप्र-२०१५/युओआर- ५८/ प्र.क्र. ११४/नवि-२६ दिनांक २१ डिसेंबर, २०१५.

६) शासन निर्णय क्र.नासुप्र-२०१५/ युओआर- ५८/ प्र.क्र.११४/नवि-२६, दि.३० ऑक्टोबर, २०१७.

७) शासन निर्णय क्र. नासुप्र-२०१७/प्र.क्र.९६/नवि-२६ दिनांक २३ ऑक्टोबर २०१७ व शुध्दीपत्रक दिनांक २६ ऑक्टोबर, २०१७.

८) शासन निर्णय क्र. नासुप्र-२०१७/प्र.क्र. ९६/नवि-२६, दिनांक १० ऑक्टोबर, २०१८.

९) शासन निर्णय क्र.नासुप्र-१६२२/प्र.क्र.२२७/नवि-२६, दि.१३ मार्च, २०२३.

१०) शासन निर्णय क्र.नासुप्र-१६२२/प्र.क्र.२२७/नवि-२६, दि.१९ डिसेंबर, २०२३.

११) शासन निर्णय क्र.नासुप्र-२०२४/प्र.क्र.३२०/नवि-१६, दि.१६ डिसेंबर, २०२४.

१२) शासन निर्णय क्र.नासुप्र-२०२३/प्र.क्र.५०८/नवि-१६, दि.०६ जुलै, २०२३.

१३) शासन निर्णय क्र.नासुप्र-२०२३/प्र.क्र.५०८/नवि-१६, दि.०८ जानेवारी, २०२४.

१४) शासन निर्णय क्र.नासुप्र-२०२३/प्र.क्र.५०८ (भाग-२)/नवि-१६, दि.०४ मार्च, २०२४.

१५) शासन निर्णय क्र.नासुप्र-१६२२/प्र.क्र.२२७/नवि-२६, दि.२८ मार्च, २०२५.

१६) राज्यस्तरीय शिखर समितीच्या दि.०२ मे, २०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

श्री. महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी, नागपूर या तिर्थस्थळाच्या टप्पा १ व टप्पा २ करिता संदर्भ क्र. ५, ६, ७ व ८ येथील शासन निर्णयांन्वये एकूण रु.२२०.८१ कोटी इतक्या किंमतीच्या कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तसेच या तिर्थस्थळाच्या टप्पा ३ व टप्पा ४ करीता एकूण रू.२१४.९४

कोटी किंमतीच्या कामांना संदर्भ क्र. ९ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

श्री. महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी या तिर्थस्थळाच्या विकासाकरीता टप्पा १ व टप्पा २ च्या कामांकरीता एकूण रू.२२०.८१ कोटीच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या प्रशासकीय मान्यतेकरिता निर्गमित शासन निर्णयांमध्ये वस्तु व सेवाकराचे (GST) समावेश करण्यात आला नव्हता.

२. वित्त विभाग शासन निर्णय दिनांक ११ सप्टेंबर, २०१७ अन्वये स्पष्ट केल्यानुसार अट क्र. ब मध्ये निविदा जर दिनांक ०१ जुलै , २०१७ पूर्वी दाखल केली असल्यास व काम दिनांक ०१ जुलै, २०१७ नंतर पूर्ण होणार असल्यास त्या कामावर वस्तू व सेवा कर आकारणी होणार आहे. सदर प्रकारच्या कंत्राटाबाबत वस्तु व सेवा कर आकारणी पूर्व आणि वस्तु व सेवा कर आकारणी नंतरच्या कराचा भार लक्षात घेणे आवश्यक आहे. त्यानुसार श्री महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी या तिर्थस्थळाच्या विकास कामाकरीता टप्पा १ व टप्पा २ अंतर्गत प्रशासकीय मान्यतेमध्ये समाविष्ट नसलेले वस्तु व सेवा कर (GST), किंमतीत बदल (Price Variation) इ. घटकांकरीता रू. ४४.९४ कोटी निधी उपलब्ध करून देण्याकरीता तसेच, आराखड्याअंतर्गत टप्पा-३ व टप्पा-४ च्या मंजूर आराखड्याच्या कामाच्या व्याप्तीत सुधारणा करण्याबाबत प्रस्ताव शिखर समितीसमोर मान्यतेसाठी सादर करण्याबाबत जिल्हाधिकारी, नागपूर तथा सदस्य सचिव जिल्हास्तरीय समिती यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये प्रस्ताव सादर केला.

३. त्याअनुषंगाने श्री. महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी ता. कामठी जि. नागपूर बाबत दि.०२ मे, २०२५ रोजी मा.मुख्यमंत्री तथा अध्यक्ष शिखर समिती यांच्या अध्यक्षतेखाली शिखर समितीची बैठक घेण्यात आली. सदर बैठकीत झालेल्या चर्चेदरम्यान प्राप्त मान्यतेनुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

**१.** श्री महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी या तिर्थस्थळाच्या विकास कामाकरीता टप्पा १ व टप्पा २ अंतर्गत प्रशासकीय मान्यतेमध्ये समाविष्ट नसलेले वस्तु व सेवा कर (GST) रू.१६.६९ कोटी, किंमतीत बदल (Price Variation) करीता, प्रकल्प किंमतीच्या ६ टक्के नुसार रू.१०.५९ कोटी व प्रकल्प किंमतीच्या १० टक्के पर्यवेक्षण शुल्क रू.१७.६६ कोटी असा एकूण रू.४४.९४ कोटी निधी उपलब्ध करून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

या कामांकरीता **आवश्यक** अर्थसंकल्पीय तरतुद (००) (१४) नगरपरिषद क्षेत्रातील यात्रा स्थळांच्या विकास कार्यक्रमासाठी सहायक अनुदान(कार्यक्रम) (२२१७०९५१) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली करण्यात यावी.

**२.** श्री महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी या तिर्थस्थळाच्या विकास कामाकरीता टप्पा ३ व टप्पा ४ अंतर्गत संदर्भ क्र. ९ व संदर्भ क्र.१० येथील शासन निर्णयामधील अट क्र. २, अट क्र. ६ व अट क्र. ८ मध्ये

"नागपूर सुधार प्रन्यास" या ऐवजी "नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण" अशी सुधारणा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

तसेच संदर्भ क्र. ११, १२ व १३ येथील शासन निर्णयांमधील अट क्र. १, अट क्र. ३, अट क्र. ६, अट क्र.१४, अट क्र. १६, अट क्र. १८, अट क्र. २४, व अट क्र. २६ मध्ये "नागपूर सुधार प्रन्यास" या ऐवजी "नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण" अशी सुधारणा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. संदर्भ क्र. ११, १२, १३ येथील शासन निर्णय दिनांक ०६ जुलै, २०२३ मधील अट क्र .२ पुढीलप्रमाणे आहे:-

"सदर प्रकल्प ८० टक्के हिस्सा राज्य शासनाचा व २० टक्के हिस्सा नागपूर सुधार प्रन्यास यांचा राहणार आहे." **या ऐवजी**

"सदर प्रकल्पाचा संपूर्ण हिस्सा राज्य शासनाचा राहील", अशी सुधारणा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

या कामांकरिता **आवश्यक** अर्थसंकल्पीय तरतुद "(००)(११) श्री महालक्ष्मी जंगदबा संस्थान कोराडी, जि.नागपुर या तीर्थस्थळ विकास आराखडयाच्या अंमलबजावणीसाठी नागपूर सुधार प्रन्यासला सहाय्य (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१७ A०११)" या लेखाशिर्षाखाली करण्यात यावी.

४. अ) श्री महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी या तिर्थस्थळाच्या विकास कामाकरीता रू. १५६.०० कोटी इतक्या किंमतीच्या कामांकरीता निविदा प्रक्रिया पार पाडण्यात आली. सदर निविदा प्रक्रियेमध्ये न्युनतम रकमेची निविदा प्राप्त झाल्याने त्या फरकापोटी काही निधी उपलब्ध होत आहे. या फरकाच्या रकमेचा खर्च करण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीला देण्यात येत आहेत.

ब) या फरकामधून खालील कामे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | हनुमान मुर्तीच्या फाउंडेशनचे बळकटीकरण करण्याकरीता | रु.२.५० कोटी. |
| २ | वृक्षारोपण | रु.८.४८ कोटी |
| ३ | झाडांच्या देखभालीकरीता | रु.१.३७ कोटी |

क) कामाच्या व्याप्तीत (Scope of Work) बदल झाल्यामुळे आवश्यकतेनुसार अतिरीक्त बाबी (Extra Item) व नविन प्रस्तावीत कामे मे. व्हायएफसी-बीबीजी (Joint Venture) यांची कंत्राटदाराशी रू.१३१.७३ कोटीच्या कामातून करावयाची नविन कामे एकूण प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच राहतील याची जिल्हाधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

ख) या कामांकरिता होणारी अर्थसंकल्पीय तरतुद "(००)(११) श्री महालक्ष्मी जंगदबा संस्थान कोराडी, जि. नागपुर या तीर्थस्थळ विकास आराखडयाच्या अंमलबजावणीसाठी नागपूर सुधार प्रन्यासला सहाय्य (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१७ A०११)" या लेखाशिर्षाखाली करण्यात यावी.

५. दि.१९ डिसेंबर, २०२३ रोजीच्या प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत विवरणपत्रातील “क” मध्ये नमूद सुधारीत कामांना, त्यांच्या व्याप्तीमध्ये सुधारणा करण्यास, तसेच विवरणपत्रातील “ब” मध्ये नमूद कामे वगळण्यास मान्यता देण्यात येत आहे. कामांच्या व्याप्तीच्या अनुषंगाने विवरणपत्रातील स्तंभ क्र.५ मध्ये नमूद केलेल्या सुधारीत किंमतींना मान्यता देण्यात येत आहे. तसेच या पुर्वीच्या कोणत्याही शासन निर्णयामध्ये अंतर्भूत नसलेल्या व विवरणपत्रातील “ड” मध्ये नमूद नव्याने प्रस्तावित कामांना मान्यता देण्यात येत आहे.

<u>विवरणपत्र</u>

| **शासन निर्णयातील अ. क्र.** | **कामाचा वाव** | **रक्कम रू. कोटीत** | **कामात झालेला बदल** | **रक्कममध्ये अपेक्षित सुधारणा रू. कोटीत** | **शेरा** |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ५ | मोनो रेल ७ स्थानकासह २.५ कि.लो. मीटर जॉय ट्रेन | १७.४६ | जमिनीवर धावणारी जॉय ट्रेन प्रस्तावीत आहे. | १२.७७ | सदर मोनोरेल जमिनीपासून ३ मिटर उंच राहणार होती. त्याऐवजी जमिनीवर धावणारी जॉय ट्रेन प्रस्तावीत असल्यामुळे बचत होत आहे. |
| ६ | किड्स ॲडव्हेंचर पार्क - इनडोअर आणि आउटडोअर किड्स ॲडव्हेंचर गेम्स | ३१.१९ | किड्स ॲडव्हेंचर पार्क - इनडोअर आणि आउटडोअर किड्स ॲडव्हेंचर गेम्स | २०.५९ | सदर काम नविन इमारतीचे बांधकाम करून करण्यात येणार होते. मात्र अस्तित्वात असलेल्या इमारतीमध्ये दुरूस्ती करून सदर काम करण्यात येत असल्यामुळे बचत होत आहे. |
| **(ब) प्रशासकीय मान्यतेतून वगळावयाची कामे** | | | | | |
| ७ | मेरा भारत महान- FRP मध्ये भारतातील २९ राज्यांच्या इमारती आणि उंचीचे प्रदर्शन | २५.३७ | - | ०.०० | **प्रशासकीय मान्यतेमधील तीन कामे वगळण्यात येत असून या ऐवजी नविन कामे करण्याचे प्रस्तावीत आहे.** |
| ८ | ॲम्युझमेंट पार्क क्षेत्र विकास - जमीन विकास, हार्ड पेव्हिंग स्टॅम्प काँक्रीट इ. | ५.७६ | | ०.०० | |

| शासन निर्णयातील अ. क्र. | कामाचा वाव | रक्कम रू. कोटीत | कामात झालेला बदल | रक्कममध्ये अपेक्षित सुधारणा रू. कोटीत | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| **११** | ॲम्युझमेंट पार्क ब्रिज - वॉटर बॉडी आणि पुलाचे आकर्षण वैशिष्टय | १.०९ | | ०.०० | |
| **(क) अस्तित्वातील कामांमध्ये वाढ** | | | | | |
| **१३** | ॲम्युझमेंट पार्क राइड्स | १८.६९ | ॲम्युझमेंट पार्क राइड्स | २०.७९ | आधुनिक राईड्स घेतल्यामुळे कामात वाढ |
| **१७** | विविध (रॉयल्टी आणि चाचणी शुल्क इ.) | ०.५४ | विविध (रॉयल्टी आणि चाचणी शुल्क इ.) | २.५० | नविन कामे हाती घेतल्यामुळे रॉयलटीमध्ये वाढ |
| **(ड) नव्याने प्रस्तावित कामे** | | | | | |
| | - | ०.०० | १. नविन महाव्दारचे काम. | १५.१६ | पंप हाउसजवळ ३१ मिटर रूंद सॅन्ड स्टोनमध्ये काम करण्याचे प्रस्तावीत आहे. |
| | | ०.०० | २. हायवे ते मंदीराकडे जाणारा ८०० मिटर लांबीच्या रस्त्यावर ग्रिलचे बांधकाम. | ०.८३ | रस्ता सुषोभिकरण करण्याच्या दृश्टीने रस्त्याच्या बाजूला कर्ब बिम व त्यावर ग्रिलचे काम प्रस्तावीत आहे. |
| | | ०.०० | ३. पार्कींग - डब्लुबीएम रस्ता, पीसीसी, आरसीसी ड्रेन (पावसाचे पाणी व केबल टाकण्याकरीता), सिव्हर लाईन | ५.५७ | हनुमान मुर्तीकडे जाणारा ५०० मिटर लांबीच्या रस्त्यावर पार्कीगचे काम प्रस्तावीत आहे |
| | | ०.०० | ४. टॉयलेट ब्लॉक | ०.४० | हनुमान मुर्ती परिसरात नवीन टॉयलेट ब्लॉक प्रस्तावित |
| | | ०.०० | ५. हनुमान मुर्ती परिसरात तलावाच्या बाजुनी विकासाची कामे | ९.९२ | हनुमान मुर्तीचे दर्शन घेण्याकरीता येणा-या भावीकांची गर्दी होवू नये याकरीता तलाव परिसराचे |

| शासन निर्णयातील अ. क्र. | कामाचा वाव | रक्कम रू. कोटीत | कामात झालेला बदल | रक्कममध्ये अपेक्षित सुधारणा रू. कोटीत | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | रूंदीकरण करणे. |
| | | ०.०० | ६. चौपाटीचा विकास करणे | ७.५७ | हनुमान मुर्तीकडे जाणारा ५०० मिटर लांबीच्या रस्त्यावर तलावाच्या बाजूनी विकास करणे. |
| | | ०.०० | ७. मुख्य महामार्गावर दोन बस स्टॉपचे बांधकाम | १.५० | दोन बस स्टॉपचे बांधकाम महाव्दार जवळ प्रस्तावीत |
| | - | ०.०० | ८. हनुमान पुतळा इमारतीचे सुशोभिकरण | २.५० | हनुमान पुतळा इमारतीचे आरसीसी स्ट्रक्चरचे बांधकाम महाजेनकोतर्फे करण्यात आलेले आहे. इमारतीचे फिनीशींगचे काम करण्याचे प्रस्तावीत आहे. |
| | **एकूण रू कोटी** | **१००.१०** | **एकूण रू कोटी** | **१००.१०** | |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२९१२५४५२७३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2025.05.29 12:56:00 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. श्री.चंद्रशेखर बावनकुळे, मा.विधानसभा सदस्य.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

९. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.

१०. जिल्हाधिकारी, नागपूर.

११. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास तथा महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर.

१२. पोलीस महानिरीक्षक, नागपूर/ पोलीस अधिक्षक, नागपूर.

१३. प्रादेशिक परिवहन अधिकारी, नागपूर विभाग, नागपूर.

१४. अधिक्षक अभियंता, महावितरण, नागपूर विभाग, नागपूर.

१५. विभागीय व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, नागपूर विभाग, नागपूर.

१६. निवड नस्ती (नवि-२६).